# प्रेमळ भूत

**बाळ** : प्रिय भुतांनो, अं ऽऽ सॉरी सॉरी, प्रिय मुलांनो, आता मी तुम्हांला, माझ्या मित्राची म्हणजे भुताची गोष्ट सांगणार आहे.
ही आहे खरीखुरी भुताची गोष्ट!
हंड्रेड पर्सेंट भुताची, 'शंभूनाथ भुताची' गोष्ट!! ही गोष्ट ऐकताना इकडेतिकडे पाहू नका, भलतेसलते ऐकू नका, हातपाय हलवू नका, मानसुद्धा वळवू नका, अंधार करू नका, उजेड पाहू नका, चुळबूळ करू नका, कारण ...

**भूत** : ही गोष्ट शंभूनाथ भुताची आहे. हा ऽऽऽ हा ऽऽऽ हा हा हा, हू हू हू.

**बाळ** : थांब रे! तू बोलू नकोस मध्ये.
मे महिन्याच्या सुट्टीत मी गावाला गेलो होतो. एकदा संध्याकाळी मला खूप कंटाळा आला. मी भटकत भटकत गावाबाहेर आलो. कंटाळून एका चिंचेच्या झाडाखाली बसलो.
अमावस्येचा दिवस होता. संध्याकाळची वेळ होती.
आजुबाजूला कुणीही नव्हतं. रातकिडे किर्रऽ किर्रऽ करत होते. पानांची सळसळ सुरू होती.
मी आपल्याच विचारात चिंचेच्या पारावर पाय हलवत बसलो होतो. इतक्यात झाडाच्या मागून मला कण्हल्याचा आवाज ऐकू आला. मी मान वळवून मागे पाहिलं.
एक छोटासा पांढरा माणूस पाय धरून बसला होता.
त्याचा चेहरा रडवेला झाला होता.
मी त्याच्याकडे पाहून हसलो. तर तो म्हणाला,

**भूत** : बाऽऽळ, जरा मदत करशील का रे?
मी तुझे उपकार कध्धी कध्धी विसरणार नाही रे!

**बाळ** : अहो, उपकार कसले? मला सगळ्यांना मदत करायला आवडते.



बोला, काय मदत करू? पाय दुखतायत? चेपू?

**भूत** : ऊंऽ नको नको. अरे बाळ, माझ्या पायात काटा गेलाय. काय करणार? जुनी खोड जात नाही!

**बाळ** : एव्हढंच ना! त्यात काय मोठं?

मी त्याच्या पायातला काटा टपकन् काढला अन् तो माणूस आनंदाने विचित्र ओरडला. मला शाबासकी देत तो म्हणाला,

**भूत** : अरे, आमच्या हाताला नीट बोटं नसतात, त्यामुळे त्याला नीट नखं नसतात आणि त्यात मी माझा चष्मा विसरलो स्मशानात. त्यामुळे काटा दिसेना! जुनी सवय नडली! आणखी काय?

**बाळ** : आँ? जुनी सवय? कुठली सवय?

**भूत** : अरे, आम्ही पायात चप्पल घालत नाही की बूट घालत नाही. म्हणून आम्ही जमिनीवरून चालत नाही. म्हणजे तुमच्यासारखे पाय टेकून चालत नाही! पण मी नुकताच भूत झालोय ना त्यामुळे विसरलोच. चुकून पाय टेकला अन् काटा टोचला!

**बाळ** : अं ऽऽऽ म्ह.. म्ह.. म्हणजे? तुम्ही भूत आहात?

**भूत** : होय ऽऽ! शंभूनाथ भूत...! हा हा हा हा!!

**बाळ** : म..म... मला भुताची भिती वाटते ऽऽऽ

**भूत** : आँ? का बरं? मी का तुझे डोळे फोडले? की कान उपटले? तुझ्या मानगुटीवर बसलो? की ...

**बाळ** : न् न् न् ... आणखी काही बोलू नका... हो.

**भूत** : अरे बाळ, असा घाबरतोस काय मला?

**बाळ** : म् म् म् मी प्रथमच भूत पाहतोय हो.

**भूत** : अच्छा! अच्छा!! मग नीट पहा. अरे दोस्ता, मी तुझा मित्र आहे! मी तुला काही करणार नाही.

**बाळ** : नक्की? नक्की?? मला काही करणार नाही ना?

**भूत** : हा हा हा हा! म्हणजे फक्त एक गोष्ट करीन....!

**बाळ** : आँ ऽऽऽऽऽ कुठली गोष्ट कराल?

**भूत** : सांगू ऽऽऽऽऽ?

**बाळ** : हंऽऽ लवकर ....प्लीऽऽऽज...!

**भूत** : तुला मी मदत करीन! हा हा हा हा!! तुझ्याशी प्रेमाने, मायेने वागीन. तू सांगशील ते सारं ऐकीन.

**बाळ** : हु ऽऽश्श! बरं झालं. मी आता तुला प्रेमळ भूत म्हणेन! चालेल?

**भूत** : ओके! चालेल!!

**बाळ** : ए प्रेमळ भुता, तू हल्ली हल्ली भूत झालास ना?

**भूत** : हो रे!

**बाळ** : मग तू अगोदर काय करत होतास?

**भूत** : अभ्यास!

**बाळ** : काय? अभ्यास? म्हणजे परीक्षा-बिरीक्षा?

**भूत** : मग? तू काय समजलास काय? मेल्यावर काय कुणालाही भूत होता येत नाही. त्यासाठी परीक्षा द्यावी लागते. लेखी, तोंडी आणि प्रॅक्टिकल!

**बाळ** : अँ? प्रॅक्टिकल म्हणजे?

भूत : हं! म्हणजे अनेक गोष्टी करून दाखवायच्या. अं.. अं... उदाहरणार्थ,
पाय उलटे करून फिरायचे, चित्रविचित्र आवाज काढायचे. रात्रभर जागायचे, दिवसभर झाडावर लोंबकळायचे.
कुट्ट काळ्या अंधारात कुणालाही न भिता फिरायचे.
स्मशानात, मोडक्या वाड्यात, पडक्या विहिरीत आनंदाने राहायचे.
पेटलेल्या चितेमधे आंघोळ करून स्वच्छ व्हायचे.

बाळ : बापरे! खूपच कठीण आहे हे सारं. हे नुसतं ऐकूनच मी घामाघूम झालोय.

भूत : गेली वीस वर्षं मी दिवसाची रात्र करून अभ्यास करतोय! गेल्याच अमावस्येला मी ९९.९८ टक्के मार्क मिळवून पहिला आलो! आज मध्यरात्री जिल्ह्याच्या स्मशानात माझा सत्कार आहे!!
पुढच्या अमावस्येला मला दिल्लीच्या स्मशानात जावं लागेल.
मी नॅशनल लेव्हलला पहिला आलोय ना!!

बाळ : शाब्बास! शाब्बास प्रेमळ भुता! यू आर ग्रेट!!

भूत : थँक्यु! थँक्यु व्हेरी मच!! पण मित्रा, आज जर तू माझ्या पायातला काटा काढला नसतास तर ...

बाळ : तर? तर काय?

भूत : भुतनाथाने मला कायमचं लंगडं करून टाकलं असतं रे. मी तुझे उपकार कध्धी कध्धी विसरणार नाही. तू मला बोलवलंस की मी येईन लगेच तुला मदत करीन. तुझ्यासाठी गाणी गाईन, नाच करी, काय वाट्टेल ते करीन.

बाळ : प..ण.. पण.. तुला बोलवायचं कसं?

भूत : अगदी सोप्पं! नीट लक्ष देऊन ऐक ...
उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेव.
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेव.
ही बोटे जुळवून घे. बाकी बोटे दुमडून घे. डोळे बंद करून घे.
ह्या बोटांचा होईल चौकोन. ह्या चौकोनात मार फूंक तीन वेळा.
आणि म्हण प्रेमळ भूता पाच वेळा...
मी फुंक मारीन तुझ्या कानाला. ओळख! मी आलोय मदतीला!
मगच बोट सोड, डोळे उघड, नाहीतर तुझा होईल दगड!!
मित्रा, नीट लक्षात ठेव. आपली दोस्ती कायम ठेव!!
ओ ऽह! गप्पा मारताना खूप उशीर झाला. आता निघायला हवं.

बाळ : एक विचारू ...

भूत : येस. लवकर विचार.

बाळ : तू मदतीला आल्यानंतर ...

भूत : ये है राईट सवाल, आहा ! मी मदतीला आलो की, मी फक्त तुलाच दिसेन, माझं बोलणं तुलाच ऐकू येईल. तू मनातल्या मनात बोललास तरी मी ते ऐकेन. तू सांगितलेलं मी सगळं सगळं ऐकेन.

बाळ : ये ही है राईट राईट दोस्ती, आहा!

भूत : हे बघ. आता खूप संध्याकाळ झालीय. तुझी आजी घरी काळजी करतेय.
आता तू डोळे बंद कर आणि मी सांगितले की उघड हं! शाब्बास!!
मी तुला तुझ्या अंगणात नेऊन ठेवतो.

भूत : आता उघड डोळे. ओके!

बाळ : ओह! थँक्यू!!

भूत : बा ऽऽय्.

बाळ : फिर मिलेंगे.

□□□

# जादूची पट्टी

बाळ : आम्हांला इतिहास शिकवणाऱ्या बाई अचानक रजेवर गेल्या आणि नवीन बाई आल्या.

नवीन बाईंच्या एका हातात पुस्तक आणि दुसऱ्या हातात जाडजूड पट्टी!

बापरे ! आम्ही तर फारच घाबरलो. कारण जर कुणी वर्गात बोलला, हसला, कुजबुजला, चुळबुळला, धडपडला, गडबडला, बडबडला तर त्याच्या उजव्या हातावर, डाव्या हातावर, उजव्या पायावर, डाव्या पायावर, उजव्या कुल्ल्यावर, डाव्या कुल्ल्यावर; डोक्यावर किंवा पाठीवर कुठेही पट्टी बसत असे.

रोज कमीत कमी वीस मुलांना सत्तावन्न वेळा पट्टीप्रसाद मिळत असे. ह्या नवीन बाई खरंच चांगल्या शिकवायच्या. पऽणं..

आम्हांला सारखी भीती वाटायची प्रसादाची. त्यामुळे आमचं सारखं लक्ष पट्टीकडे.

आमचं लक्ष पट्टीकडे म्हणून बाईंचे लक्ष आमच्याकडे आणि बाईंचे लक्ष आमच्याकडे म्हणून 'प्रसाद' पण आम्हांलाच मिळे.

एकदा मी भीत-भीत बाईंना म्हणालो, ''बाऽई, ती सुंदर पट्टी जरा बाजूला ठेवून द्या ना. प्ली ऽऽऽ ज.'' पण पुढच्याच क्षणी बाईंनी ती पट्टी माझ्याच पाठीत ठेवून दिली. पाठ झणझणली!

मी ब्रेक डान्स करत जागेवर जाऊन बसलो.

मी घरी गेल्यावर विचार केला की, ''उद्यासुद्धा इतिहासाचा तास आहे. आता पाठ झणझणली तरी उद्या पाठ फिरवून चालणार नाही. पट्टीला तोंड द्यावेच लागेल.

बाळ : काय करावे? मला सुचेना. त्या पट्टीमुळे माझे पुस्तकाकडे लक्ष जाईना.

मग मात्र मी डोळे बंद केले.

उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेवले.
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले.
ही बोटे जुळवली, बाकी बोटे दुमडली.
ह्या बोटांचा झाला चौकोन.
ह्या चौकोनात मारली फुंक... तीन वेळा.
आणि म्हणालो, प्रेमळ भुता... पाच वेळा.
तोच कानावर आली फुंक, धावत आले प्रेमळ भूत!

भूत : हा हा हा हा! बोल, मित्रा बोल, काय मदत करू?
गारांचा पाऊस पाडू? की ढीगभर आणू लाडू?

बाळ : अहं. तसं काही नको रे!
मग मी त्याला माझ्या 'ब्रेक डान्स' ची गोष्ट सांगितली,
तर प्रेमळ भूत खदाखदा हसत म्हणाले,

भूत : सब समझा. हा हा हा हा! सब समझा, सब समझा
अब किसी का **नही** गमजा! हा हा हा हा!!

बाळ : दुसरा दिवस उजाडला. इतिहासाचा तास सुरू झाला. एका हातात पुस्तक आणि दुसऱ्या हातात जाडजूड पट्टी घेऊन बाई शिकवू लागल्या. माझ्या पोटात बाकबुक सुरू झाली.

इतक्यात मला जोरात शिंक आली.

बाईंनी माझ्याकडे रागाने पाहिलं. बाई जवळ आल्या. बाईंनी मला मारायला पट्टी उगारली, ...

आऽऽणि काय चमत्कार!

माझ्या पाठीवरून हळूवारपणे एक मोरपीस फिरलं!

आँ ? बाई गडबडल्या. जराशा घाबरल्या. कारण त्यांच्या हातातल्या पट्टीचे मोरपीस झाले होते! बाईंनी पिशवीतून दुसरी पट्टी काढली. मुलं घाबरली!

पण पट्टी हातात घेतल्यावर तिचे पुन्हा मोरपीस झाले !! बाईंनी इथून -तिथून सत्तावीस पट्ट्या आणल्या, पण काऽऽही उपयोग नाही. मी म्हणालो, बाई ह्या मोरपिसांचा पंखा चांगला होईल. शिकवताना तुम्हांला वारा घेता येईल. बाई तुम्ही खरंच चांगलं शिकवता. आम्हांला खूप आवडता. बाई! हसत हसत वारा घेऊ लागल्या.



बाईंनी मोरपिसाच्या पंख्याने वारा घेतला आणि म्हणाल्या,
ह्या मोरपिसाच्या पंख्याचा वारा किती छान आहे.
ह्या इतिहासाच्या तासाला पट्टी इतिहासात जमा झाली आहे.

**बाळ** : मोरपिसाच्या पंख्याने वारा घेताच इतिहासाचा तास संपला.
तेव्हाच एक छोटासा घोटाळा झाला.
सगळ्या मोरपिसांच्या पुन्हा पट्ट्या झाल्या !!
पट्टीच्या पंख्याने वारा घेत बाई वर्गाबाहेर गेल्या !!!

❑❑❑

# फिश् टँक धमाका

**बाळ** : माझ्या चुलत भावाचं नाव अजित. पण त्याला सगळे अजू म्हणतात. दर रविवारी सकाळी अजू आमच्या घरी येतो. पण ह्या रविवारी मी अजूच्या घरी गेलो. काऽऽरण..

**अजू** : कारण, माझ्या बाबांनी नवीन फिश् टँक आणला होता. फिश् टँक म्हणजे एका मोऽऽठ्या काचेच्या पेटीत पाणी भरून ठेवलं होतं आणि ह्या पाण्यात रंगीबेरंगी अठ्ठावीस मासे होते. एकदम मस्त मासे.

**बाळ** : मला पाहताच काका म्हणाले –

**काका** : एऽऽऽ लांब उभं राहून मासे पाहायचे. फिश् टँकला हात लावायचा नाही, पाण्यात हात घालायचा नाही, माश्यांना त्रास द्यायचा नाही, दंगामस्ती करायची नाही, ढकलाढकली अजिबात नाही. क्काऽऽऽय? कळलं ना? दोघंजण शांतपणे खेळा.

**बाळ** : पण काका, आम्ही तीसजण शांतपणे खेळून चालेल?

**काका** : काऽऽय? तीऽऽस जणं? कोण हे? कुठायत ते?

**बाळ** : अहो असं काय करताय? ते काय पाण्यात आहेत! म्हणजे मी, अजू आणि अठ्ठावीस मासे!!

**काका** : हा हा हा! पण लक्षात ठेवा. जर का फिश् टँकला लागला धक्का तर तुम्हांला मिळेल फटका. काऽऽय?

**बाळ** : काका आम्हांला दम भरून आतल्या खोलीत गेले. मग आम्ही तीसजण खेळू लागलो. मी पाण्यात बोटं घातली, मासे जवळ आले.

**अजू** : मी अख्खा हात पाण्यात फिरवला, मासे लांब पळाले.

**बाळ** : मी माश्यांच्या अंगावर पाणी उडवलं, मासे हसले.

**अजू** : मी माश्यांना बोट लावलं, मासे चिडले.

**बाळ** : मी हळूच एक मासा चिमटीत पकडणार होतो, पण तो सुळकन् पळाला.

अजू : मग मी पण तस्संच केलं.

बाळ : चिमटीत मासे येत नाहीत, म्हणून आम्ही मुठीत मासे पकडू लागलो. पण मासे सुळ्सुळ्, चुळ्चुळ् पळू लागले.

बाळ / अजू : आम्हांला राग आला. आम्ही टाचा उंचावून, दोन्ही हात फिश् टँकमधे घातले.

बाळ : आम्ही पकडापकडी खेळू लागलो.

अजू : आमचा खेळ रंगात आला आणि रंगीत मासे जीव घेऊन पळू लागले.

बाळ : खेळताना माझी आणि अजूची धक्काबुक्की होऊ लागली. ढकलाढकली,, दंगामस्ती, मारामारी होऊ लागली. आऽऽणि... बरोब्बर! तेच झाले!! टेबलावरचा काचेचा फिश् टँक धाडकन जमिनीवर पडला आणि खळकन फुटला !! माश्यांप्रमाणे काकासुद्धा बाहेर आले. तडफडणारे मासे पाहून आमच्यावर चरफडले.

अजू : माझे पाय लटलट कापू लागले. माश्यांप्रमाणे आमच्याही तोंडचे पाणी पळाले, आमचेही डोळे पांढरे झाले.

बाळ : मासे फडफडू लागले, तडफडू लागले मग मात्र मी डोळे बंद केले.
उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेवले.
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले.
ही बोटे जुळवली. बाकी बोटे दुमडली.
ह्या बोटांचा झाला चौकोन.
ह्या चौकानात मारली फुंक... तीन वेळा आणि म्हणालो, प्रेमळ भुता पाच वेळा.. तोच कानावर आली फुंक ... धावत आले प्रेमळ भूत ...

भूत : हा हा हा हा हा बोल मित्रा, काय मदत करू?
सरबताचा समुद्र करू? की आईस्क्रीमचा डोंगर करू?
ह्या मुलांच्या मानगुटीवर बसू? की वेड्यासारखा हसू?

बाळ : अहं, तसं काही नको रे.
मग मी त्याला मनातल्या मनात सारं सांगितलं.

भूत : सब समझा. हा हा हा हा! सब समझा, सब समझा.
अब किसी का नही गमजा. हा हा हा हा.

बाळ : आऽऽणि काय चमत्कार! काका खुर्चीत बसले. त्यांचे डोळे बंद झाले. त्याच वेळी खोलीमधे एक छोटे तळे तयार झाले.
तडफडणारे मासे, तळ्यामधे पोहू लागले, फिश् टँक जोडला गेला, टेबलावर जाऊन बसला, तळ्यासकट सगळे मासे फिश् टँकमधे गेले.
काका खूर्चीतून उठले. त्यांचे डोळे उघडले.

काका : आँ? काऽयरे मघाशी आवाज कुठला झाला?
मला वाटलं, फिश् टँकच फुटला!

बाळ : नाही, नाही आम्ही खेळत असताना, फिश् टँक ओरडला!

काका : अच्छा अच्छा! म्हणजे तुम्ही एकतीसजणं खेळत होतात तर.
तुम्ही, मासे आणि फिश् टँक हा हा हा!

बाळ : हो हो!!
पण मी मनातल्या मनात म्हणालो, आम्ही तर एकतीसजणंच होतो की, मी, अजू, मासे आणि ..

भूत : मी सुद्धा, मी सुद्धा, मी सुद्धा! हा हा हा ऽऽऽ..........

❐❐❐



# ढोलम् ढोल वर्ग

**बाळ** : आमच्या वर्गातली सर्व मुलं जाडमूजाड, ढोलम् ढोल झाली आहेत, हे तुम्हांला कळलंच असेल आमच्या शाळेत, आमच्या वर्गाला जाड्या वर्ग म्हणतात.
अर्थात् ही सगळी प्रेमळ भुताची कृपा.
पूर्वी, मधली सुट्टी झाली की, आम्ही सर्व मुलं ह्या बाकावरून त्या बाकावर उड्या मारायचो. दंगा करायचो, मस्ती करायचो. गोंगाट करायचो, एकमेकांना धपाटे मारायचो, गुच्चे घालायचो.
खाली पडलो, आपटलो, धडपडलो तरी टुणकन उडी मारून पुन्हा मस्ती सुरू करायचो. प..ण.. आता हे सारं जमत नाही.
आता आम्ही सर्व गलेलठ्ठ झालो आहोत!
एके दिवशी गंमत झाली.
शाळेत आम्हाला डब्यात भाजी-पोळी न्यावीच लागते.
मधली सुट्टी झाली. आम्ही भराभर डबे उघडले.
कुणी भेंडीची, बटाट्याची, पडवळाची भाजी आणली होती.
पण माझा एक मित्र, घाईघाईत चुकून रिकामाच डबा घेऊन आला होता.
रिकामा डबा बघताच त्याचा चेहरा खारट झाला!
मी म्हणालो घाबरू नकोस, खारट चेहरा करू नकोस.
एक मिनिट थांब जरा, मग खाशील भराभरा!!
मी डबा घेऊन कोपऱ्यात गेलो. डोळे बंद केले.
उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेवले.
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले.
ही बोटे जुळवली, बाकी बोटे दुमडली.
ह्या बोटांचा झाला चौकोन
ह्या चौकोनात मारली फुंक... तीन वेळा.
आणि म्हणालो प्रेमळ भुता... पाच वेळा.
तोच कानावर आली फुंक,
धावत आले प्रेमळ भूत!

**भूत** : हा हा हा हा! बोल मित्रा बोल, काय मदत करू?
पाण्याखाली जाळ करू? की मोत्याची माळ करू?

**बाळ** : अहं असलं काही नको रे भुता.
मग मी त्याच्या कानात गंमत सांगितली.

**भूत** : सब समझा! हा हा हा हा!!
सब समझा, सब समझा.
अब किसीका नही गमजा! हा हा हा हा!!



आणि काय चमत्कार!
तो रिकामा डबा गुलाबजामने भरून गेला.
हे पाहताच आमचे डोळे रसगुल्ल्याएवढे मोठे झाले.
आम्ही प्रेमाने आमच्या डब्यातली थोडी पोळी-भाजी त्याला दिली.
त्याच्या डब्यातले भरपूर गुलाबजाम आम्ही घेतले.
तरीसुद्धा गुलाबजामाचा डबा भरलेलाच!
मग आम्ही दे दणादण ताव मारला. प्रत्येकाने कमीत कमी पस्तीस गुलाबजाम खाल्ले!!
आणि रोज दुपारी मधल्या सुट्टीत हाच चमत्कार होऊ लागला.
कधी डब्यातून चॉकलेट बर्फी, तर कधी मावा केक, क्रीम केक तर कधी, चमचमीत पाव-भाजी, गरमागरम बटाटेवडे!
त्यामुळे डबा खाल्ल्यावर आम्हांला मस्ती-कुस्ती, आरडाओरड, मारामारी करायला वेळच मिळत नाही.
रोज प्रत्येकजण एक किलो श्रीखंड, तर कधी दोन लिटर बासुंदी, सोळा बटाटेवडे, तर सत्तावीस क्रीमकेक खातो. खाऊन खाऊन सुस्ती येते आणि मग कसेबसे जागे राहतो.
खरं सांगतो, आम्हा शहाण्या मुलांना दंगामस्ती करायला, बाकावरून उड्या मारायला अजिबात आवडत नाही.
मधल्या सुट्टीत आमच्या वर्गात अगदी शांतता असते!
म्हणून तर आम्हांला बक्षीस मिळालंय. 'आदर्श' ढोलम् ढोल वर्ग!

❒❒❒

# चमनगोटा

**बाळ** : ह्या मे महिन्यात गावाला माझी मुंज झाली. सर्व नातेवाईक आले होते. सगळेजण माझेच लाड करत होते. त्यामुळे खूप खूप मज्जा आली. मला वाटलं, दर मे महिन्यात आपली मुंज व्हावी. पण...
पण एक गोष्ट मात्र मला तितकी आवडली नाही...
मला सांगतानाही जर लाऽऽजच वाटतेय. ते म्हणजे,
माझी चकोटी केलेली मला अजिबात आवडली नाही.
आपल्या टकलावरून हात फिरवताना मला कसंसंच वाटे.
पहिल्या दिवशी डोक्यावरून हात फिरवला तेव्हा मला मऊ मऊ पेरूवरून हात फिरवल्यासारखं वाटलं आणि दोनच दिवसात त्या मऊ मऊ पेरूचा, खरबरीत नारळ झाला हो!
टोपी घातली तर गरम व्हायचं आणि टोपी काढली तर चमनगोटा दिसायचा!
माझी फार पंचाईत झाली होती, कारण शाळेचा पहिला दिवस जवळ आला तरी माझा हिरवागार चमनगोटा तस्साच!
मी येता जाता टकलावर खसाखसा तेल चोळायचो, पण काऽऽही उपयोग नाही.
शाळेचा पहिला दिवस उजाडला.
मी भीत-भीत शाळेत गेलो. शाळा भरली. वर्गामध्ये कोपऱ्यात बसलो. आमच्या वर्गात सत्तर मुलं आहेत. त्यातल्या एकाने माझ्याकडे पाहिलं आणि तो आनंदाने किंचाळला.

**पहिला** : चम्मन गोऽऽटा ......

**दुसरा** : लाल टमाटा!

**तिसरा** : उद्या सकाळी पेढे वाटा!

**चौथा** : चम्मन गोटा ......

**पाचवा** : एवढा मोऽऽठ्ठा!

**साहवा :** टकल्यावरती बांधा फेटा!

**सातवा :** चम्मन गोटा ......

**आठवा :** हातात लोटा ......

**नववा :** पाठीत सोटा!

**दहावा :** अहाहा, चम्मन चम्मन!

**अकरावा :** अहाहा, गोटा गोटा!!

**बारावा :** अहाहा, मोठा मोठा!!!

**सर्वच मुलं :** हो हो हो, चम्मन गोटा! हो हों हो, चम्मन चम्मन गोटा गोटा!

**बाळ :** मी घट्ट कान बंद केले. पण सगळी मुलं मला चिडवतच होती. मला असह्य झालं. मग मी डोळे बंद केले.
उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेवले.
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले.
ही बोटे जुळवली, बाकी बोटे दुमडली.
ह्या बोटांचा झाला चौकोन.
ह्या चौकोनात मारली फुंक... तीन वेळा.
आणि म्हणालो, प्रेमळ भुता... पाच वेळा.
तोच कानावर आली फुंक
धावत आले प्रेमळ भूत!

**भूत :** हा हा हा हा बोल मित्रा बोल, काय मदत करू?
विटी दांडू खेळायला हरणाची कवटी आणू?
की, गोट्या खेळायला घुबडाचे डोळे आणू?

**बाळ :** हॅ हॅ हॅ! असलं काही नको रे भुता.
मग मी त्याच्या कानात गंमत सांगितली.

**भूत :** सब समझा, हा हा हा हा! सब समझा, सब समझा!
अब किसी का नही गमजा! हा हा हा हा!!
आणि काय चमत्कार! ज्या ज्या मुलांनी मला चिडवलं, ज्यांनी ज्यांनी 'चम्मन गोटा' हा शब्द उच्चारला, त्या सगळ्यांचे ... 'चम्मन गोटे' झाले.
वर्गातल्या सत्तर मुलांपैकी बावन्न मुलांचे चमन गोटे झाले.
बाकीच्यांचे केस लांबच राहिले! काऽऽरण –
त्या सर्व मुली होत्या!!
मुलींची हसता हसता पुरेवाट झाली.
इतक्यात सर वर्गात आले. आमच्याकडे पाहत ओरडले...

**सर :** आँ ऽऽऽ, हे काय? सगळ्यांच्या चकोट्या? एकाच वर्गात बावन्न चकोटे!! अरे, हा वर्ग आहे की मुंजीचा हॉल?
आणि हे एकावन्न चकोटे अगदी ताजे वाटताहेत पेरूसारखे.
आणि तो चमन गो ...

**बाळ :** मी धावत जाऊन सरांच्या तोंडावर हात ठेवला.
चुकून त्यांनी 'चमन गोटा' हा शब्द उच्चारला असता...
तऽऽर ...
क्या? सब समझे ना?

❑❑❑



# लाईट गेले, भूत आले

बाळ : परवा अचानक घरातले लाईट गेले. रात्रीची वेळ. सगळीकडे अंधार. पंखा बंद झाला, गरम होऊ लागलं.
आईला अंधारात दिसेना. जेवण करता येईना. आईने गॅस बंद केला आणि बाहेर येऊन बसली. बाबा म्हणाले, बहुधा फ्युज गेला असेल. फ्युज घातला की लाईट येईल. मी आत्ता फ्युज घालतो, बाबा बॅटरी घेऊन बाहेर गेले. मग मात्र मी डोळे बंद केले.
उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेवले.
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले.
ही बोटे जुळवली, बाकी बोटे दुमडली.
ह्या बोटांचा झाला चौकोन.
ह्या चौकोनात मारली फुंक... तीन वेळा.
आणि म्हणालो, प्रेमळ भुता... पाच वेळा.
तोच कानावर आली फुंक, धावत आले प्रेमळ भूत!

भूत : हा हा हा हा, बोल मित्रा बोल, काय मदत करू?
मुसळधार पाऊस पाडू? की गाढवासारखा ओरडू?

बाळ : अहं. तसलं काही नको रे. हे बघ, आमच्या घरातले लाईट गेलेत. तर लगेच लाईट आण.

भूत : किती आणू?

बाळ : अरे किती काय? घरभर आण! काऽय?

भूत : सब समझा, सब समझा! अब किसीका नही गमजा! हा हा हा हा!!

बाळ : आईने सहज स्वयंपाकघराकडे पाहिले आणि ती घाबरून किंचाळली.
मी भीत-भीत तिकडे पाहिलं तर ... काय चमत्कार!
संपूर्ण स्वयंपाकघर ट्युब लाईटने भरून गेले होते!
प्रेमळ भूत माझ्या कानात कुजबुजले,

भूत : ह्या एकूण पाच हजार तीनशे नव्वद आहेत.
अजून हव्यात का?

बाळ : घरभर पांढऱ्या ट्युब लाईट पाहून माझे डोळे पांढरे झाले.
मी कसाबसा म्हणालो, 'अरे भुता, उजेड पाड!'.
आणि त्या क्षणी,
त्या पाच हजार तीनशे नव्वद ट्युबलाईट पेटल्या!
आणि घर पेटल्यासारखा घरात प्रकाश पडला!!
आईने डोळे गच्च बंद केले, डोकं दाबून धरलं.
माझ्या डोळ्यांसमोर अंधारी आली.
मी वैतागून ओरडलो, 'अरे शंभूनाथा, लाईट बंद कर.'
पुन्हा गुडुप्प अंधार झाला!
त्याचवेळी बाबांनी फ्युज घातला. बटणं सुरू केली.
पण लाईट काही लागेना.
बाबा म्हणाले, 'कमालच आहे! लाईट कसे लागत नाहीत?'
मग.. मात्र.. मी.. डोळे.. बंद.. केले..
आणि ... घरातले... लाईट.. आले!

□□□



# बोकडकांदा मावशी

**बाळ** : आईबरोबर बाहेर फिरायला गेलो की मी हट्ट करतो.
मला प्रत्येक दुकानातल्या कमीत कमी दहा-पंधरा वस्तु हव्याच असतात आऽऽणि खेळण्याच्या व मिठाईच्या दुकानातल्या कमीत कमी सर्व वस्तु मला लगेचच हव्या असतात.
मी आईकडे एक हजार पाचशे पन्नास वस्तुंसाठी हट्ट केला तर मला एकतरी वस्तु हमखास मिळते आणि हो.....
आईबरोबर फिरायला बाहेर पडले आणि आईला कुणी मैत्रीण भेटली तर ते मला अजिबात आवडत नाही.
आई त्या मैत्रिणीशी बोलत राहते, मग मला काही हट्टच करता येत नाही आणि हट्ट केला नाही म्हणून काहीच मिळत नाही.
काल संध्याकाळी मी आईबरोबर फिरायला बाहेर गेलो होतो. आज काय-काय हट्ट करायचा हे मी सकाळपासूनच ठरवून ठेवलं होतं.
मी काही बोलणार इतक्यात आईला एक बडबडी मैत्रीण भेटली.
भेटल्याबरोबर तिची बडबड, बडबड, बडबड सुरू झाली. मला राग आला. मला आईशी काही बोलताच येईना.
मी आळोखे-पिळोखे दिले. चालता-चालता उड्या मारल्या.
वेडीवाकडी तोंडे केली.
आईचा हात ओढत मोठ्यांदा ओरडलोसुद्धा, पण तिची बडबड, ऐकून आईच्या तोंडचं पाणी पळालं होतं. माझे कान किटले होते.
डोकं जड झालं होतं. मी खूप वेळा मधे मधे बोलण्याचा प्रयत्न केला, पण काऽऽही उपयोग नाही. तिची आपली बडबड, बडबड, बडबड, बडबड, बडबड सुरूच! मग मात्र मी डोळे बंद केले.
उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेवले.
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले.
ही बोटे जुळवली. बाकी बोटे दुमडली.
ह्या बोटांचा झाला चौकोन.
ह्या चौकोनात मारली फुंक... तीन वेळा
आणि म्हणालो प्रेमळ भुता... पाच वेळा.
तोच कानावर आली फुंक, धावत आले प्रेमळ भूत!

**भूत** : हा हा हा हा! बोल मित्रा बोल, काय मदत करू?
बैलाएवढा ससा आणू की उडणारा मासा आणू?



बाळ : अहं असलं काही नको रे भुता.
मी मनातल्या मनातच त्याला सगळं सांगितलं. ते त्याला ऐकू आलं.

भूत : सब समझा. हा हा हा हा! सब समझा, सब समझा
अब किसीका नही गमजा! हा हा हा हा!!

बाळ : आणि काय चमत्कार!
बडबड बडबड बडबड करणाऱ्या मावशीच्या तोंडातले एकेक दात हळूहळू अदृश्य होऊ लागले.
ती घाबरून किंचाळली आणि आईला म्हणाली,

मावशी : अद बाई! हे ताय? अत काय दाल? मया कायी कयतच नाही! इते कायी भुतातकी बितातकि नायी ना? मया भिती वातते, बाई! मादे दात गेये, आता दीब नाही ना दानाल गं? ए शांगा ना शांगा. अते हत्ता काय?

बाळ : आता दात गेल्याने मावशीच्या तोंडचे पाणी पळालं आणि हसून हसून आमच्या डोळ्यांत पाणी आलं.

मावशी : अदं बाई, माझ्या तोंदात बोलकं दालं आनि माझा बोबलकांदाच दाला की हो!

❑❑❑

# भूत घोटाळा

बाळ : खरं तर ही गोष्ट मी तुम्हाला सांगणारच नव्हतो. कारण काल वर्गात माझीच फजिती झाली आणि ही फजिती कुणामुळे झाली, हे तुम्ही ओळखलं असेलच म्हणा.
आम्हांला शाळेत बाईंनी कविता पाठ करायला सांगितली होती.
कविता पाठ करताना माझे नेहमी घोटाळे होतात.
दुसरी ओळ पाठ केली की, मी पहिली ओळ विसरतो आणि...
तिसरी ओळ पाठ केली की, पहिल्या दोन ओळी विसरतो.
काही वेळा शेवटच्या ओळी आधी म्हणतो, आधीच्या ओळी मग म्हणतो आणि मधल्या ओळी मनात म्हणतो. त्यामुळे कविता पाठ करायचा मला जाम कंटाळा येतो. टीव्हीवर क्रिकेटची मॅच बघणे, टीव्हीवरच्या सगळ्या जाहिराती बघणे, त्या पाठ करणे, टीव्ही पाहत असताना अधून-मधून ओरडणे, टाळ्या वाजवणे, मग आईची बोलणी खाणे, लवकर झोपणे आणि उशिरा उठणे. ह्यामुळे मी कविता पाठ करायला विसरलो, त्याला मी तरी काय करणार? मी घाबरतच शाळेत जायला निघालो. जाताना मला माझे मित्र भेटले. ते पण माझ्याचसारखे! कविता पाठ न केलेले!! पण ... ते अजिबात घाबरलेले नव्हते. ते तर सचिन तेंडुलकर, ब्रायन लारा, सलमान खान, माधुरी दीक्षित अशा अत्यंत महत्त्वाच्या विषयावर गप्पा मारत चालले होते. माझा आंबट चेहरा पाहून माझा मित्र माझी पाठ थोपटत म्हणाला,

मित्र : हॅ ऽ काऽऽही घाबरू नकोस. मी तुला एक आयडिया सांगतो. अरे, बाई किनई अख्ख्या वर्गाला एकदम कविता म्हणायला सांगतात. बाकी सगळ्या मुलांनी कविता पाठ केलीच असणार की. काऽऽय? इतर मुलं कविता म्हणतील, तेव्हा आपण फक्त तोंड हलवायचं! अहाहा! आहे किनई भारी आयडिया?

बाळ : मी कशीबशी मान हलवली आणि शाळेत गेलो. घंटा झाली. शाळा भरली. मराठीचा तास सुरू झाला. बाई यायला एक मिनिट अवकाश होता. मुलांचा गोंगाट सुरू होता. मग मात्र मी डोळे बंद केले. उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेवले. डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले. ही बोटे जुळवली, बाकी बोटे दुमडली. ह्या बोटांचा झाला चौकोन.
ह्या चौकोनात मारली फुंक.. तीन वेळा.
आणि म्हणालो, प्रेमळ भुता... पाच वेळा.
तोच कानावर आली फुंक धावत आले प्रेमळ भूत!

भूत : हा हा हा हा! बोल मित्रा बोल, काय मदत करू?
वेड्याला शहाणा करू की शहाण्याला काणा करू?

बाळ : अंहं तसं काही नको रे. हे बघ, आम्ही काही मुलांनी कविता पाठच केली नाही. तर आम्हांला मदत कर आणि हो, मागच्या वेळेसारखा घोटाळा करू नकोस. जा पळ. काम कर.

भूत : हा हा हा हा. सब समझा. सब समझा! सब समझा!!
अब किसी का नही गमजा! हा हा हा हा.

बाळ : वर्गात बाई आल्या. मुलं शांत झाली. बाईंनी आम्हांला कविता म्हणायला सांगितली, आऽऽणि चमत्कार झाला! प्रचंड घोटाळा झाला!! ज्या ज्या मुलांनी कविता पाठ केली नव्हती, ती ती सगळी मुलं एका सुरात म्हणाली, 'आम्ही कविता पाठच केली नाही. तरी आम्हाला मदत कर आणि हो, मागच्या वेळेसारखा घोटाळा करू नको जा. पळ. काम कर.'
आणि,
बाईंनी आम्हांला कशी मदत केली असेल?
अन् आमची कशी पळापळ झाली असेल?
प्रत्येकाच्या पाठीवर कशी कविता वाजली असेल?
हे तर तुम्ही नक्कीच ओळखलं असेल ... कारण...
मी तर तुमचाच मित्र आहे ना? काऽय ?

# आमचं घर

बाळ : मला कॉटवर लोळत गोष्टींची पुस्तकं वाचायला आवडतं. अंगणात खेळायला आवडतं. टीव्हीवर क्रिकेटची मॅच पाहायलासुद्धा खूप आवडतं. पण मला निबंध लिहायला, स्पेलिंग पाठ करायला, गणितं सोडवायला अजिबात आवडत नाही. मला निबंध लिहिताना तर खूप त्रास होतो.
कारण, त्यावेळी अक्षर खूप चांगलं काढावं लागतं आणि चुका करून चालत नाही.
आमच्या बाई जाम कडक आहेत.
निबंधात जर एक चूक झाली तर ती दहा-दहा वेळा लिहावी लागते. एकदा तर माझा सबंध निबंध चुकला होता असं बाईंना वाटलं. त्याचं असं झालं -
निबंधाचा विषय होता, 'माझा आवडता प्राणी!
मी लिहिलं, 'माश्याला पंख असतात तरी तो उडत नाही. पाण्यात राहून पाणी पीत नाही. मासे पाण्यातून बाहेर पडले की मच्छी मार्केटमध्ये राहतात. हे मासे मला खूप खूप आवडतात. मी घरी भरपूर मासे खातो आणि सुशेगात झोपतो.'
हा निबंध वाचल्यावर बाईंना राग आला. त्या म्हणाल्या,

बाई : काऽऽयरे? तुला कसं कळलं मासे पाणी पीत नाहीत?

बाळ : क्षणभर माझ्याच तोंडचं पाणी पळालं. पण मी धीर करून म्हणालो, 'अहो बाई, मासे जर पाणी प्यायले असते तर समुद्रातले मासे खारट नसते का लागले? पापलेट तर किती टेस्टी असतं! एकदम सही!!
माझ्या तर तोंडाला पाणी सुटलं.
बाई आवंढा गिळत म्हणाल्या,

बाई : बरं बरं. तुझा पुढचा निबंध नीट पाहते.

बाळ : ह्या वेळी निबंधाचा विषय होता, 'माझं घर'.

मला घराबाहेर खेळायला जायची घाई होती. अंगणात माझे मित्र क्रिकेट खेळत होते. मला माझ्या घरात चैन पडेना. काय करावं? निबंध तर लिहिला पाहिजे. खेळायला तर गेलंच पाहिजे.
मग मात्र मी डोळे बंद केले.
उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर, दुसरे बोट घट्ट ठेवले.
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले.
ही बोटे जुळवली, बाकी बोटे दुमडली.
ह्या बोटांचा झाला चौकोन
ह्या चौकोनात मारली फुंक... तीन वेळा.
आणि म्हणालो, प्रेमळ भुता ... पाच वेळा.
तोच कानावर आली फुंक, धावत आले प्रेमळ भूत!

**भूत** : हा हा हा हा! बोल मित्रा बोल, काय मदत करू?
बे ते तीस पाढे हज्जार वेळा काढू की,
जगातली सगळी पुस्तके एका क्षणात फाडू?

**बाळ** : अंहं, तसं काही नको रे.
त्यापेक्षा चांगल्या अक्षरात, चुका न करता, 'माझं घर' हा निबंध लिही.

**भूत** : सब समझा. हा हा हा हा.
सब समझा, सब समझा
अब किसी का नही गमजा! हा हा हा हा.

**बाळ** : आऽऽणि काऽऽय चमत्कार!
निबंधाच्या वहीत, सुंदर अक्षरात 'माझं घर' हा निबंध उमटला.
मी खुश झालो. मी मनातल्या मनात प्रेमळ भुताला शाबासकी दिली.
वही दप्तरात ठेवली. घराबाहेर खेळायला धूम ठोकली.
दुसरा दिवस उजाडला.
मी शाळेत गेलो.
सर्व मुलांनी आपापल्या निबंधाच्या वह्या बाईंना दिल्या.
बाईंनी प्रथम माझीच वही उघडली.
मी बाकावर ऐटीत बसलो होतो.
बाईंनी माझ्याकडे पाहिलं. मी हसलो. बाई हसून म्हणाल्या,

**बाई** : व्वा! काय सुंदर अक्षर आहे! जणू काही टप्पोरे मोती!

**बाळ** : मी प्रेमळ भुताचे आभार मानले
बाई माझा निबंध वाचू लागल्या....
आऽऽणि -
बाई जोरात किंचाळल्या. त्यांनी वही फेकून दिली.
त्या खुर्चीत कोसळल्या. क्षणभर त्यांचे डोळे पांढरे झाले. त्यांना घाम फुटला. त्या भीत भीत म्हणाल्या,

**बाई** : अरे, हा निबंध तू लिहिला आहेस की भुताने?
अरे, मी पहिली तीन वाक्यं वाचली, तर मला चक्करच आली.
बाइ गं बाई! असलं काही वाचायला पण मला भीती वाटते.
राम राम राम राम.

**बाळ** . मी खाली पडलेली वही उचलली. मी पहिली तीन वाक्यं वाचली तर, मलाही धडकी भरली. कारण ती वाक्यं अशी होती...
'मी, माझे आईवडील आणि आजी-आजोबा गावाबाहेरच्या स्मशानात आनंदाने राहतो! मी रोज रात्री बारा वाजता कवटी-दांडू खेळतो, तेव्हा माझे आजोबा वडाच्या झाडावर लोंबकळत असतात!! ह्या अमावस्येला आमच्या घरी माझ्या वडिलांची मरणदिवसाची पार्टी आहे...' या पार्टीला बाई तुम्ही येणार ना?
आमचं घर आम्हांला खूप खूप आवडतं! हा हा हा हा हा!!
बाई, मी तुमची वाट पाहतो हं!

❐❐❐

# भुताटकी

बाळ : माझ्या चुलत भावाचं नाव अजित. पण त्याला सगळे अजू म्हणतात. दर रविवारी सकाळी अजू आमच्या घरी येतो. मग आम्ही एकत्र खातो-पितो, खेळतो-बिळतो, मस्ती-बिस्ती करतो, अभ्यास-बिभ्यास करतो, संध्याकाळी बागेत जातो. मग अजू घरी जातो.
परवा रविवारी विचित्र प्रकार घडला!
आमच्या इकडची लोकं अजून घाबरलेली आहेत.
दुपारची वेळ होती. इतक्यात रस्त्यावरून आवाज ऐकू आला–
कुल्फीवाला ऽऽऽ कुऽऽल्फीऽऽ
मलई कुल्फी, पिस्ता कुल्फी, पेशल बदाम-पिस्ता कुल्फी गारेगार थंडगार कुल्फी ऽऽऽ

बाळ : हे ऐकल्यावर आमच्या तोंडाला पाणीच सुटलं.
आईकडे थोडासा हट्ट केल्यावर आई प्रसन्न झाली. आईने पैसे दिले.

आई : अरे दुपारची वेळ आहे, बाहेर कडक ऊन आहे. डोक्यात टोपी घालून जा.
मी टोप्या शोधल्या. एक टोपी मी घातली; दुसरी टोपी मी अजूला देणार तोच अजू हातात पैसे घेऊन धावत सुटला तर आई म्हणाली, जा पळ लवकर आणि त्याच्या डोक्यात टोपी घाल.

बाळ : जेवण टुम्म झाल्याने मला पळताच येईना.
मग मात्र मी डोळे बंद केले.
उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेवले.
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले.
ही बोटे जुळवली, बाकी बोटे दुमडली.
ह्या बोटांचा झाला चौकोन.
ह्या चौकोनात मारली फुंक... तीन वेळा.
आणि म्हणालो प्रेमळ भुता.. पाच वेळा
तोच कानावर आली फुंक, धावत आले प्रेमळ भूत!

भूत : हा हा हा हा. बोल मित्रा बोल, काय मदत करू?
अख्खा डोंगर चिरू आणि मध्ये समुद्र पसरू?

बाळ : अरे, असलं काही नाही रे भुता.
मग आई जे म्हणाली तेच त्याला सांगितलं, ''जा. पळ लवकर आणि त्याच्या डोक्यात टोपी घाल.''

भूत : सब समझा. हा हा हा हा. सब समझा सब समझा,
अब किसी का नही गमजा! हा हा हा हा!!

बाळ : आऽऽणि दारात उभी असलेली आई जोऽऽरात किंचाळली. ही किंचाळी ऐकून आजुबाजुची लोकं धावत बाहेर आली. बाहेर आलेली बायका-माणसं किंचाळू लागली.



कारण टोपी अधांतरी अजुच्या मागे तरंगत गेली. ब्रेक लागल्यासारखा अजू थांबला. त्याच्या डोक्याचे हळू-हळू पेरू चिरल्यासारखे दोन भाग होऊ लागले आणि हवेत तरंगणारी टोपी डोक्यात आत आत जाऊ लागली. अजू पुतळ्यासारखा उभा होता! खो खो हसत होता!! हे भयानक दृश्य पाहून सोळा बायका बेशुद्ध पडल्या; तर अकरा माणसांना चक्कर आली! मी जोरात ओरडलो, प्रेमळ भुता थांब! अरे शंभ्या, डोक्यात टोपी घाल म्हंजे डोक्यावर टोपी ठेव.

**भूत** : अस्सं होय! अब समझा!!

**बाळ** : आत गेलेली टोपी सावकाश बाहेर आली. चिरलेलं डोकं पुन्हा जोडलं गेलं! टोपी डोक्यात बसली.

ही भुताटकी पाहून कुल्फीवाल्याचीच कुल्फी झाली! तो थंडगार गारेगार पडत चालला होता!! त्याने अजुला पाहून कोपरापासून नमस्कार केला; अख्खी कुल्फीची टोपली त्याने आम्हांला दिली! आहे किनई मज्जा! एकदम सही!

□□□

# थप्पड भाजी

मला हे नक्को ते नक्को मला हे आवडत नाही, ते अज्जिबात आवडत नाही, हेच आईला आवडत नाही. म्हणजे, मला कार्ल्याची कडू कडू भाजी आणि ताकातली भेंडीची बुळबुळीत भाजी बिलकुल आवडत नाही. पण आई महिन्यातून एकदा तरी ह्या भाज्या करते. मला बळे-बळे खायला लावते. मी खाईपर्यंत बाजूला बसते आणि खाताना मी टंगळमंगळ केली तर... मला भाजीसोबत थप्पड पण खावी लागते.

काही वेळा आधी थप्पड खातो, मग भाजी गिळतो.

हं ऽ पण मुख्य सांगायचं राहिलंच बघा.

आई माझ्यावर कित्तीही रागवली ना तरी आईच माझे जास्ती लाड करते.

मला न आवडणाऱ्या भाज्यांचे दोन घास आणि एक थप्पड खाऊन झाली की, मग आई मला माझ्या आवडीची बटाट्याची सुकी भाजी, जाम, काकडीची कोशिंबीर देते. परवा गंमतच झाली. आईने भेंडीची बुळबुळीत भाजी केली होती. नेहमीप्रमाणे दोन घास आणि एक थप्पड चुकवली!

आईने मला प्रेमाने विचारलं, ''काऽऽय? कशी आहे? ''मी लगेच आनंदाने म्हणालो, ''होती चांगली! पण थोडक्यात चुकली!!''

त्याबरोबर आई समाधानाने हसत म्हणाली, ''गुणाचा रे माझा राजा! खा. खा. आवडली ना? भरपूर खा!!'' आऽऽणि...

आईने मला भेंडीची बुळबुळीत भाजी घातली.

आणि माझ्या पाठीवरून हात फिरवत म्हणाली, ''खा राजा, खा. अरे, तुला भाजी आवडली, हेच मला आवडलं.''

आणि स्वयंपाकघरात निघून गेली. मी कपाळाला हात लावला.

मी आईला म्हणालो होतो थप्पड चांगली होती. पण मी ती चुकवली!'

अन् आईला वाटलं, 'भाजी चांगली होती आणि मला ती चुकली!'

आता बोला!

पानात भाजी पाहून मला कलकलायला लागलं. पोटात कळवळायला,

चळवळायला, बुळबुळायला, मुळमुळायला; काय वाट्टेल ते व्हायला लागलं.

माझ्या नाकातोंडात भाजी गेलीय आणि कानातून भाजीचा रस वाहतोय, असंही वाटू लागलं. मग मात्र मी डोळे बंद केले,

उजव्या हाताच्या पहिल्या बोटावर दुसरे बोट घट्ट ठेवले,
डाव्या हाताच्या दुसऱ्या बोटावर पहिले बोट नीट ठेवले.
ही बोटे जुळवली, बाकी बोटे दुमडली.
ह्या बोटांचा झाला चौकोन.
ह्या चौकोनात मारली फुंक... तीन वेळा.
आणि म्हणालो, प्रेमळ भुता... पाच वेळा.
तोच कानावर आली फुंक, धावत आले प्रेमळ भूत!

**भूत** : हा हा हा हा! बोल मित्रा बोल, काय मदत करू? गुलाबाच्या फुलामधे मोगऱ्याचा वास भरू की आंब्याच्या झाडावरचे आणू तुला पेरू?

**बाळ** : अहं, असलं काहीच नको रे भुता. मी मनातल्या मनातच त्याला सगळं सांगितलं. ते त्याला ऐकू आलं.

**भूत** : सब समझा, हा हा हा हा. सब समझा, सब समझा! अब किसीका नही गमजा! हा हा हा हा.

**बाळ** : आणि चमत्कार झाला! पण कुणालाच नाही समजला!! मी आवडीने तोंड वाकडं न करता, कुरकुर न करता भेंडीची भाजी खाऊ लागलो. हे दृश्य पाहून आईला खूप खूऽऽप आनंद झाला! आई म्हणाली, किती शहाणा गं माझा राजा!
हं ऽ काय झालं महित्यै का? मी हातात घास घेतला की, ती भेंडींची भाजी असायची आणि घास तोंडात घातला की, ती बटाट्याची भाजी व्हायची, तर कधी जाम व्हायचा.
अश्शी गंमत! पण, हे माझ्या आईला सांगू नका हं. नाहीतर एक किलो भाजीनंतर मला दहा किलो थपडा खाव्या लागतील.

❒❒❒

# शाळेतील भुताटकी

**बाळ** : मी प्रेमळ भुताला म्हणालो, चल ना रे शाळेत. मला एकट्याला जायला कंटाळा येतो. आपण जाताना गप्पा मारत जाऊ.

**भूत** : नको रे बाबा. मला भीती वाटते.

**बाळ** : भीती? कसली भीती?

**भूत** : मी शाळा सोडल्याला आता खूप वर्षं झाली. मी पुन्हा शाळेत आल्याचं जर सरांना समजलं तर ते मला बदडतील. काठीने चांगलं झोडतील. नको. नको. तेव्हढं सोडून बाकी काही सांग.

**बाळ** : अरे वेडा रे वेडा. अरे, तू असतोस अदृश्य! मग तुला आमचे सर कसे ओळखणार?

**भूत** : हो रे! विसरलोच मी!!

**बाळ** : मग येशील ना शाळेत?

**भूत** : अं... पण मी शाळेत येऊन बसणार कुठे?

**बाळ** : बस माझ्या दप्तरात.

**भूत** : आणि मी करू काय?

**बाळ** : कर आम्हांला मदत.

**भूत** : हॅ! हे काहीतरीच. मी काय मदत करणार?

**बाळ** : म्हणजे आम्हांला अभ्यास करायला मदत कर.

**भूत** : अब समझा. शाळा सुरू झाली की, मी मुलांच्या कानात फुंक मारीन, शेंबड्या मुलांचे नाक ओढीन. त्यांच्या पोटावर गुदगुल्या करीन, काही मुलांचं खाली डोकं वर पाय करीन आणि सरांना....

**बाळ** : नको नको नको. ही मदत नव्हे, ह्याला खोड्या म्हणतात. आणि हे बघ, आमच्या सरांना तू काहीसुद्धा करायचं नाहीस. आम्हांला आमचे सर खूप आवडतात हां. तू फक्त माझ्या सोबत चल. मग मीच सांगेन तुला, काय मदत करायची ते...

**भूत** : बरं बरं. पण, तुम्ही चांगलं शिकावं म्हणून मी मदत करेन.

बाळ : ओ के. मग मी आणि प्रेमळ भूत गप्पा मारत, रमत-गमत शाळेत गेलो. आज माझ्या दप्तरात कोण आहे, हे मी कुणालाच सांगितलं नाही. काऽऽरण....लहान लहान मुलंच काय, पण मोठी माणसं, अगदी टकलू माणसंसुद्धा भुताला घाबरतात. प्रेमळ भुताला चित्रविचित्र आवाज काढायची, अधे मधे ओरडायची फार वाईट सवय आहे. मी त्याला सांगितलं, 'ही शाळा आहे. शाळेत शिस्त पाळली पाहिजे.' तो हळूच पुटपुटला

भूत : सब समझा सब समझा.

बाळ : घंटा झाली. शाळा भरली. आमचे आवडते जोशी सर वर्गात आले. सर्व मुले उभी राहिली... आऽऽऽणि... माझं दप्तर पटकन हवेत गेले! म्हणजे प्रेमळ भुतसुद्धा उभे राहिले!! मी त्याला हळूच चापटी मारली आणि म्हणालो, जमिनीवरच राहा.

सर : बाऽळ, दप्तर हवेत फेकू नकोस, नीट ठेव.

बाळ : मी मान खाली घातली आणि मी हात लावण्याअगोदरच दप्तर आपोआप जागेवर जाऊन बसले.

सर : मुलांनो, आज मी तुम्हांला सामान्य विज्ञान शिकवणार आहे. पण... अशा चार भिंतींमधे मला शिकवायला आवडत नाही. मला वाटतं, आपला वर्ग बागेत झाडाखाली भरावा.

बाळ : आणि काय चमत्कार... वर्गाच्या भिंती अदृश्य झाल्या आणि तिथे आंबा, पिंपळ, चिंच, वड, डाळिंब, रामफळ, चिकू, जांभूळ, ह्यांची छोटी छोटी झाडं डोलू लागली. बाकाखालच्या जमिनीवर हिरवळ उगवली. छोटी छोटी फुलं फुलली, मुलं आनंदाने ओरडली.

मुलं : याऽऽहूऽऽ, हा हा हाऽऽ

सर : अं..अं.. हे जरा विचित्रच वाटतंय, पण ही बाग मला आवडली.

मुलं : आम्हांला पण आवडली ऽऽ. सर, आम्ही झाडावर चढू ऽऽ?

सर : शांत राहा. बागेत गडबड करू नका. हं शाब्बास.
समुद्राच्या पाण्याची वाफ झाली की आकाशात ढग जमा होतात.

बाळ : आऽऽणि पुन्हा चमत्कार!

बाळ : वर्गात नव्हे, बागेत हळू हळू ढग जमा होऊ लागले.

मुलं : ये ये ये ऽऽऽ हा ऽऽ हा ऽ

सर : अं ... अं... हे जरा वेगळंच वाटतंय, पण ठिकाय् तर, वारा ढकलत ढकलत ह्या ढगांना पुढे घेऊन जातो.

बाळ : पुन्हा चमत्कार! सोसाट्याचा वारा सुटला. वर्गातल्या बागेत ढग फिरू लागले. सर ढगांकडे पाहत भीत भीत म्हणाले,

सर : ढगांवर ढग आपटले की, गडगडाट होतो. विजा चमकतात.

बाळ : पुन्हा पुन्हा चमत्कार! वर्गातल्या बागेत ढगांचा गडगडाट सुरू झाला. विजांचा लखलखाट सुरू झाला. मुलं आनंदाने ओरडू लागली.

मुलं : ये रे ये रे पावसा, तुला देतो पैसा, पैसा झाला खोटा, पाऊस येईल मोठ्ठा!

बाळ : मुलांचा दंगा काही कमी होईना. सर तर जाम घाबरले.

सर : मी... मी... स्वप्नात आहे की, जागा आहे हेच मला कळत नाहीये. वर्गामधे बाग, बागेमध्ये झाडं..... आकाशात ढग, ढगांचा गडगडाट... अभ्यासाची वाऽऽट! पण मला शिकवलंच पाहिजे. तर मुलांनो, ढगांना थंडगार वारा लागला की, पाऊस पडू लागतो.

बाळ : पुन्हा पुन्हा पुन्हा चमत्कार! वर्गात थंडगार वारे वाहू लागले आणि मुसळधार पाऊस पडू लागला. मुलं आरडाओरडा करू लागली. पावसात भिजू लागली. बाकावर चढून ढगांना हात लावू लागली. एकमेकांच्या अंगावर नाचू लागली.

बाळ : पाणी उडवू लागली. पाण्यात लोळू लागली. जोशी सर तर ओले चिंब भिजले. मुलं भिजली, पुस्तके वह्या भिजल्या, दप्तरं भिजली... प्रेमळ भुताच्या नाकातोंडात पाणी गेले. आणि पुन्हा चमत्कार झाला! प्रेमळ भुताने विचित्र आवाजात शिंक दिली.
किऽऽ र्ऽऽ कूऽऽ हू ऽऽ कॅऽऽ कूकू! आऽऽणि...
पाऊस थांबला! वर्गातले ढग गेले. वर्गातली झाडं गेली. वर्गातली हिरवळ गेली. सगळी भिजलेली मुलं कोरडी झाली. दप्तर, वह्या, पुस्तकं, बाकं – सगळं कोरडं झालं. फक्त... जोशी सर ओले चिंब भिजलेले होते.

बाळ : आमचा आरडाओरडा ऐकून शाळेचे मुख्याध्यापक आले. सारी मुलं चुप्प बसली. ओलेचिंब जोशी सर पाहून ते रागावले. म्हणाले,

मुख्या. : हेऽऽ काऽऽय? वर्गात शिकवता? की आंघोळ करता? आं ऽऽ?

**सर** : काय करणार? आत्ता वर्गात झाडं उगवली!

**मुख्या.** : काऽऽय?

**सर** : मग वर्गात ढग आले, सोसाट्याचा वारा आला, ढगांचा गडगडाट झाला, वीजा चमकल्या!

**मुख्या.** : काऽऽय? बरं वाटतंय ना? की डोळ्यांसमोर काजवे चमकताहेत? अंऽऽ? पाणी हवंय का प्यायला?

**सर** : नको! आत्ता पावसाचं पाणी प्यायलो कीऽऽ!

**मुख्या.** : धोंड्या ऽऽ, सरांना डॉक्टरांकडे घेऊन जा. वरच्या मजल्यावर गडबड आहे म्हणावे.

**मुख्या.** : काय रे मुलांनो ऽऽ काय गडबड चालली होती?

**रमेश** : आत्ता वर्गात झाडं उगवली.

**शिल्पा** : बाकाखाली हिरवळ पसरली.

**अशोक** : वर्गातल्या बागेत ढग आले.

**माधुरी** : वारा आला. ढग फिरू लागले.

**सलमान** : वीज चमकली, ढग गडगडला

**रविना** : मुसळधार पाऊस कोसळू लागला.

**सर्व मुलं** : होऽऽ! अगदी खर्र खर्र!!

**मुख्या.** : धोंड्या ऽऽ, आधी मलाच डॉक्टरांकडे घेऊन चल रे. माझ्या वरच्या मजल्यावर ढग गडगडतायत!

**बाळ** : धोंड्याने आमचा वर्ग सोडून दिला. मी घरी जाताना प्रेमळ भुताला म्हणालो, अरे, तू सरांना का नाही कोरडं केलंस? त्यामुळे सगळी पंचाईत झाली.

**भूत** : ह्याला जबाबदार तू आहेस!

**बाळ** : आँ! मी? ते कसं काय?

**भूत** : तूच नाही का, मला म्हणाला होतास, आमच्या सरांना काही काहीसुद्धा करायचं नाही म्हणून! आठवलं?

**बाळ** : अंऽऽ हं!

**भूत** : हा हा हा! क्या? अब समझा?

❏❏❏